**वडेश्वर महादेव मंदिर, ता. सिल्लोड, जि. छत्रपती संभाजीनगर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र.८६/सां.का.३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १२ मार्च, २०२४.

<u>वाचा :-</u> संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.स्मारके/२०२४/७८९, दि.२७ फेब्रुवारी, २०२४

**<u>प्रस्तावना</u>** :-

वडेश्वर महादेव मंदिर हे राज्य संरक्षित स्मारक छत्रपती संभाजीनगर ते अंजिठा लेणी रस्त्यावर गोळेगाव पासून आतमध्ये जवळपास २० कि.मी. अंतरावर अंभई या गावात आहे. या मंदिराला मोठ्या प्रमाणात भाविक पर्यटक भेट देत असतात. हे मध्ययुगीन स्थापत्य कलेचा उत्कृष्ट नमुना असून काळाच्या ओघात मंदिराची मोठ्या प्रमाणात हानी झालेली आहे. मंदिराचा बराचसा भाग हा जांभ्या दगडांत बांधला गेला असून, मंदिराच्या शेजारी छोट्या आकाराची एक बारव अस्त्विात आहे. मंदिराच्या शिखरावर मोठ्या प्रमाणात नक्षीकाम केलेले असून, मंदिराच्या सभामंडपाच्या भागाची मोठ्या प्रमाणात हानी झालेली आहे. नंतरच्या काळात स्थानिक लोकांकडून मंदिराच्या आत व बाह्य भागावर रंगकाम केल्याने मंदिराचे विद्रुपीकरण झालेले आहे. मराठवाड्याच्या विकासाच्या कामाबाबत महाराष्ट्र राज्य मंत्रीमंडळ विशेष बैठक छत्रपती संभाजीनगर येथे दिनांक १६.०९.२०२३ रोजी पार पडली. या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयामध्ये मराठवाडा विभागातील ऐतिहासिक वास्तुचे संवर्धन करण्याचा समावेश करण्यात आला आहे. मा. मंत्री मंडळ बैठकीत झालेल्या निर्णयानूसार या विभागाकडून वडेश्वर मंदिर अंभई ता. सिल्लोड जि. छत्रपती संभाजीनगर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरस्ती कामाचे मे. आकाश अंगद, कऱ्हाड परिचय आर्किटेक्ट यांनी तयार केलेले रु.४,९९,८९,६५९/- इतक्या रकमेचे सविस्तर अंदाजपत्रक संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी मान्यतेस्तव सादर केले आहे. त्यानुसार या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :-

वडेश्वर महादेव मंदिर, ता. सिल्लोड, जि. छत्रपती संभाजीनगर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या रु.४,९९,८९,६५९/- (अक्षरी रुपये चार कोटी नव्व्यान्नव लक्ष एकोणनव्वद हजार सहाशे एकोणसाठ मात्र) (वस्तु व सेवाकरासह) या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर निधी मागणी क्र. झेडडी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक संरक्षण (कार्यक्रम) (२२०५ १३०२) २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षातील त्या त्या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण होईल हे पाहण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची राहील.

०४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१७३६४४८४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.12 17:45:42 +05'30'

**( नंदा राऊत )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई.
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, छत्रपती संभाजीनगर.
महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
महालेखापाल -१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषाधिकारी, छत्रपती संभाजीनगर.
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३.